अव्वल कारकून संवर्गातून नायब तहसिलदार संवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सरळसेवेच्या कोट्यातील पदांवर तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देणेबाबत (अमरावती विभाग).

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः पदोन्न -२०२४/प्र.क्र.११४/ई-९**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २३ ऑगस्ट, २०२४.

वाचा :-

१) उप आयुक्त (महसूल), अमरावती विभाग, अमरावती यांचे पत्र क्र.आकाअ/ म.शा.४/ प्र.क्र.१५४/ २०२४, दि.१५.०५.२०२४

**शासन आदेश:-**

अमरावती विभागातील अव्वल कारकून संवर्गातील खालील तक्त्यात नमूद कर्मचाऱ्याना नायब तहसिलदार (राजपत्रीत, गट -ब) या संवर्गात सन २०२३-२४ या निवडसूची वर्षात सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीनुसार खालीलप्रमाणे सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदांवर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच, त्यांची नायब तहसिलदार संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्र.६ येथे नमूद पदावर परिच्छेद क्र.३ येथील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

**(ब) सरळसेवा कोट्यातील रिक्त पदांवर तदर्थ पदोन्नती:-**

**१) अव्वल कारकून:-**

| अ.क्र | ज्येष्ठता क्रमांक | कर्मचाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग | पात्रता | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १६९ | श्री. एम.एस. यंबरवार | खुला | दि.२५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार तदर्थ पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय चांदुरबाजार, जि. अमरावती |

३. सदर तदर्थ पदोन्नती कोट्यातील रिक्त पदांवर तसेच सरळसेवेच्या कोट्यात तदर्थ पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१) निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ कर्मचारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाही अथवा अधिक्रमीम झालेले नाही.

२) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सा.प्र.वि. (१६-ब) कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर पदोन्नत्या देण्यात येत आहेत. तसेच दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून, त्यावरील अंतिम

निर्णयाच्या अधीन राहून वरील कर्मचाऱ्यांना तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची आहे.

३) सदर निवडसुचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारलेल्या, अधिकाऱ्यांच्या पदोन्नती संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२.०९.२०१६च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याची विभागीय आयुक्त, अमरावती यांनी दक्षता घ्यावी.

४) सदर निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता घेण्याची दक्षता विभागीय आयुक्त, अमरावती यांनी घ्यावी.

५) नायब तहसिलदार या संवर्गात पदोन्नती देण्यात येत असलेल्या वरील अधिकारी पदस्थापनेनंतर प्रत्यक्ष रूजू झाल्याखेरीज पदोन्नतीच्या संवर्गाच्या वेतनाचा लाभ अनुज्ञेय असणार नाहीत.

६) वरील अधिका-यांनी पदोन्नतीनंतर नायब तहसिलदार संवर्गात देण्यात आलेल्या पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू न झाल्यास संबंधित अधिकाऱ्याची पदोन्नती रद्द करण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.

७) सदर तात्पुरत्या पदोन्नतीच्या अनुषंगाने पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यापासून संबंधित अधिकाऱ्यांची शासनाच्या पुर्व परवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करू नये.

८) तसेच भविष्यात न्यायालयीन अथवा पदोन्नतीच्या अनुषंगाने इतर काही आक्षेप निघाल्यास याची संपुर्ण जबाबदारी विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती या कार्यालयाची राहील.

४. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून, विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांनी उपरोक्त अधिकाऱ्यांना पदस्थापनेच्या पदावर हजर होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे व पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू करून घ्यावे व त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

५. वरील अधिकाऱ्यांनी आपल्या पदाचा कार्यभार विभागीय आयुक्त / संबंधित कार्यालय प्रमुख यांच्या सल्ल्याने अन्य अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करून पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू होणे आवश्यक आहे.

६. सदरची पदोन्नती सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या मान्यतेच्या अधीनतेने देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२३१५२९२९६२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.08.23 15:45:54 +05'30'

**( श्रीकांत म. मोहिते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.

२. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
३. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
४. जिल्हाधिकारी, अमरावती.
५. प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
७. संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त अमरावती विभाग, अमरावती यांच्यामार्फत).
८. निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.